**राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) या योजनेअंतर्गत रुसा संचालनालयास निधी उपलब्ध करुन देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: रूसायो - २०१८/प्र.क्र.३४३/विशि-३,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: १३ मार्च, २०२०.

वाचा :-

(१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ८ जुलै, २०१९
(२) केंद्र शासनाचे पत्र क्र.F.No.२४-३७/२०१४-U. Policy (MHMulti-Gen), दि. २६/०९/२०१९.
(३) राज्य प्रकल्प संचालनालयाचे पत्र क्र. राप्रसं/रुसा/२०१९-२०/५१९, दि. ४/१०/२०१९.
(४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पूरक-२०१९/प्र.क्र.११५/अर्थ-३, दि. ३ जानेवारी, २०२०

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये प्राथमिक शिक्षणाचे सबलीकरण करण्यासाठी राबविण्यात आलेल्या सर्व शिक्षा अभियान व राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियानाच्या यशस्वीतेमुळे उच्च शिक्षणाची गुणवत्ता व पाया यांचे सबलीकरण करण्यासाठी एकछत्री योजना, अभियान स्वरुपात राबविण्याकरिता केंद्र शासनाने राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) ही योजना, १२ व्या व १३ व्या पंचवार्षिक योजनांमध्ये राबविण्याचे ठरविले आहे. महाराष्ट्र राज्यात उच्च शिक्षणात गुणवत्ता, सर्वदूर संधी, समानता यासाठी केंद्र शासनाने तयार केलेल्या राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानाच्या अंमलबजावणीबाबत दि.२१.०४.२०१५ रोजी मंत्रीमंडळाच्या बैठकीत निर्णय घेण्यात आलेला आहे.

राज्य मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने ही योजना राज्यात प्रभावीपणे राबविण्यासाठी राज्य प्रकल्प संचालनालयाची स्थापना करण्यात आलेली आहे. या योजने अंतर्गत अकृषी विद्यापीठे व शासकीय संस्था यांना अनुदान वितरीत करण्याचे केंद्र व राज्याचे प्रमाण ६०:४० असे ठरविण्यात आलेले आहे.

राज्य प्रकल्प संचालनालयासाठी केंद्र शासनाकडून दि.२६.०९.२०१९ रोजी रुसा २.० अतंर्गत विद्यापीठांसाठी भौतिक सुविधा (Infrastructure Grants to Universities) तसेच महाविद्यालयांसाठी भौतिक सुविधा (Infrastructure Grants to Colleges) या घटकातंर्गत **केंद्र हिस्सा (६०%) व त्याप्रमाणात राज्य हिस्सा (४०%)** अशी एकुण **रु.१९,००,००,०००/- (रुपये एकोणवीस कोटी फक्त)** एवढी रक्कम राज्य प्रकल्प संचालक,राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान यांच्या खात्यामध्ये जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान अंतर्गत मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांनी खालील तक्त्यामध्ये नमुद केल्याप्रमाणे रुसा २.० अतंर्गत विद्यापीठांसाठी भौतिक सुविधा (Infrastructure Grants to Universities) तसेच महाविद्यालयांसाठी भौतिक सुविधा (Infrastructure Grants to Colleges) या घटकातंर्गत **केंद्र हिस्सा (६०%) रु.१०,८०,००,०००/- च्या प्रमाणात राज्य हिस्सा (४०%) रु.७,२०,००,०००/-** तसेच मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या दि. २६ सप्टेंबर, २०१९ च्या निधी मंजूरी आदेशातील मुद्या क्र. १६ अन्वये शासकीय

अध्यापक महाविद्यालय, अंबाजागाई या महाविद्यालयास वळती करण्यात आलेला **केंद्र हिस्सा (६०%) रु. ६०,००,०००/- च्या प्रमाणात राज्य हिस्सा (४०%) रु.४०,००,०००/-** असा एकुण **रु. १९,००,००,०००/- (रुपये एकोणवीस कोटी फक्त)** इतका निधी राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान यांच्या खात्यामध्ये जमा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विद्यापीठाचे नाव | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | Dr. Babasaheb Ambedkar Technological University, Lonere | रु. ६,००,००,०००/- | रु. ४,००,००,०००/- | **रु. १०,००,००,०००/-** |
| | **एकूण** | **रु. ६,००,००,०००/-** | **रु. ४,००,००,०००/-** | **रु. १०,००,००,०००/-** |

| अ.क्र | महाविद्यालयाचे नाव | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | एकुण |
|---|---|---|---|---|
| १ | Institute of Science, Aurnagabad | रु. ६०,००,०००/- | रु. ४०,००,०००/- | **रु. १,००,००,०००/-** |
| २ | Shri. Maharani Tarabai Govt. College of Education, Kolhapur | रु. ६०,००,०००/- | रु. ४०,००,०००/- | **रु. १,००,००,०००/-** |
| ३ | Ismail Yusuf College of Arts, Science and Commerce, Mumbai | रु. ६०,००,०००/- | रु. ४०,००,०००/- | **रु. १,००,००,०००/-** |
| ४ | Govt. College of Education, Ratnagiri | रु. ६०,००,०००/- | रु. ४०,००,०००/- | **रु. १,००,००,०००/-** |
| ५ | PDEAs Annasaheb Waghire Arts, Commerce and Science College, Otur Junnar, Pune | रु. ६०,००,०००/- | रु. ४०,००,०००/- | **रु. १,००,००,०००/-** |
| ६ | Arts, Commerce and Science College, Lanja | रु. ६०,००,०००/- | रु. ४०,००,०००/- | **रु. १,००,००,०००/-** |
| ७ | Dnyanopasak Shikshan Mandals College of Arts, Commerce and Science, Parbhani | रु. ६०,००,०००/- | रु. ४०,००,०००/- | **रु. १,००,००,०००/-** |
| ८ | PSGVPMS Science, Commerce and SI Patil Arts College, Shahada | रु. ६०,००,०००/- | रु. ४०,००,०००/- | **रु. १,००,००,०००/-** |
| ९ | Govt. College of Education, Ambajogai | रु. ६०,००,०००/- | रु. ४०,००,०००/- | **रु. १,००,००,०००/-** |
| | **एकूण** | **रु. ५,४०,००,०००/-** | **रु. ३,६०,००,०००/-** | **रु. ९,००,००,०००/-** |

२. या संदर्भात झालेला खर्च सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्याच्या अटीच्या अधिन राहून मंजूर करण्यात येत आहे. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशोब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता राज्य प्रकल्प संचालनालयाने सादर केली पाहिजेत.

३. राज्य प्रकल्प संचालनालयास केंद्र शासनाने ज्या प्रयोजनार्थ निधी मंजुर केलेला आहे त्या निधीचा वापर त्या प्रयोजनासाठी करावा. खरेदी व बांधकामाची मान्यता विद्यापीठ / महाविद्यालयाच्या सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत घेण्यात यावीत.

४. तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. ०१/१२/२०१६ च्या शासन निर्णयातील तरतूदी व त्या सोबतच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे तसेच तद्नंतर वेळोवेळी देण्यात आलेल्या सूचनांनुसार सदरची खरेदी प्रक्रिया विद्यापीठांनी त्यांच्या स्तरावर पार पाडावी व विहित कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

५. सद्य:स्थितीत राज्य प्रकल्प संचालनालयासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून राज्य प्रकल्प संचालक, रुसा यांना व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून राज्य प्रकल्प सहसंचालक, रुसा यांना घोषित करण्यात आलेले आहे. त्यानुषंगाने आवश्यक ती कार्यवाही नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

६. राज्य हिश्श्यावरील खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशीर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (०७) (०२) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान अंतर्गत अशासकीय संस्थांना सहायक अनुदान (४० टक्के राज्य हिस्सा) (२२०२ आय २७२), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली व केंद्र हिश्श्यावरील खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशीर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (०७) (०१) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान अंतर्गत शासकीय संस्थांना सहायक अनुदान (६० टक्के केंद्र हिस्सा) (२२०२ आय २६३), ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८ जुलै, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात सदर परिपत्रकासोबतच्या परिच्छेद ७ मधील व सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ९ येथील अटी व शर्तीची पुर्तता करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.पुरक-२०१९/प्र.क्र. ११५/ अर्थ-३, दि. ३ जानेवारी, २०१९ ला अनुसरुन तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १५/१४७१, दि. १८.१.२०२० आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४०४/अर्थोपाय, दि. १४ नोव्हेंबर, २०१९ व अनौपचारिक संदर्भ क्र.१२७/२०/व्यय-५, दि.५ फेब्रुवारी, २०२० ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००३१३१६५३४१५२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pravinkumar Gulabrao Pawar

Digitally signed by Pravinkumar Gulabrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8de261729f06eda4a56aba947eceb6140d7406426b2f08c9317bea2458ec1f92, serialNumber=8f18625adb482a7ee2512cea93ce697388c95a99c89e41e85c05a3de8476488f, cn=Pravinkumar Gulabrao Pawar
Date: 2020.03.13 16:58:03 +05'30'

**(प्रविणकुमार पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई.
२) प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल, (लेखा परीक्षण), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठ.
७) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) नियोजन विभाग (कार्यासन १४७१), मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/कार्यासन अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१०) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२) सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) उपसचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) कार्यासन अधिकारी (साशि १), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) निवड नस्ती (विशि-३).